आंतरराष्ट्रीय ५ दिवसांचे कसोटी सामने सोडून इतर सर्व प्रकारच्या आंतरराष्ट्रीय क्रिकेट सामन्यांवर (एकदिवसीय,२०-२० इत्यादी) तसेच आय.पी.एल. व तत्सम सामन्यांवर मुंबई करमणूक कर शुल्क अधिनियम, १९२३ च्या कलम ३(१) (ब) मधील तरतूदीनुसार करमणूक शुल्क आकारणी करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
महसूल व वन विभाग,
**शासन निर्णय क्रमांक :ईएनटी १००७/प्र.क्र.२९/भाग-१/टी-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १४ जून २०१०.

**वाचा:-** शासन निर्णय क्रमांक ईएनटी १९६४/७२८८८/एन, दिनांक १२ मे १९६४

**प्रस्तावना:-**

राज्य शासनाच्या महसूली उत्पन्न वाढीकरिता आवश्यक उपाययोजनांतर्गत राज्य शासनामार्फत आकारण्यात येणा-या करमणूक शुल्कामध्ये आधुनिक तंत्रज्ञान व करमणूकीची वाढती साधने विचारात घेता वाढ करण्यात येत आहे. याअंतर्गत क्रिकेट या लोकप्रिय क्रिडा प्रकारावर या खेळाचे झालेले व्यावसायिकरण, या खेळास प्राप्त होणारी प्रायोजकत्वाची रक्कम तसेच लोकप्रियता याचा विचार करता एकदिवसीय आंतरराष्ट्रीय सामने, इंडियन प्रिमिअर लिग द्वारे आयोजित सामने व तत्सम सामन्यांवर मुंबई करमणूक शुल्क अधिनियम १९२३ कलम ३ (१) (ब) मधील तरतूदीनुसार करमणूक शुल्क आकारणीबाबत प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

मुंबई करमणूक शुल्क अधिनियम, १९२३ मध्ये सुधारणा करुन आंतरराष्ट्रीय ५ दिवसांचे कसोटी सामने सोडून इतर सर्व प्रकारच्या आंतरराष्ट्रीय क्रिकेट सामन्यांवर (एकदिवसीय, २०-२० इत्यादी) तसेच आय.पी.एल. व तत्सम सामन्यांवर मुंबई करमणूक कर शुल्क अधिनियम, १९२३ च्या कलम ३ (१) (ब) मधील तरतूदीनुसार करमणूक शुल्क आकारण्यात यावे.

२.		सदर प्रस्तावास  वित्त विभागाने सहमती दिली आहे.

३.		सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेब साईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक 20100614195519001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( विद्या हम्पय्या )**
**कार्यासन अधिकारी**
**महसूल व वन विभाग.**

**प्रत तातडीच्या आवश्यक कार्यवाहीसाठी**

सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,

प्रत:-

मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.मंत्री (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे स्वीय सहायक
महालेखापाल -१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर
महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा) मुंबई /नागपूर
उप सचिव (टी-१) यांचे स्वीय सहायक
सर्व कोषागार अधिकारी
निवडनस्ती (टी-१ कार्यासन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.